अल्पसंख्याक बहूल क्षेत्रामध्ये  अल्पसंख्याक
समाजातील उच्च शिक्षण घेणा-या मुलींसाठी
वसतीगृहे सुरु करण्याबाबत योजना.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
शासन निर्णय अविवि-२००९/प्र.क्र.१५/का.८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-  २ मार्च, २०१०.

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक समाजातील मुलींना मुख्य प्रवाहात आणण्याकरिता सच्चर समितीने केलेल्या शिफारशीपैकी "अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी वसतीगृहे सुरु करणे" ही एक शिफारस असून त्यानुसार मुस्लिम, जैन, बौद्ध, ख्रिश्चन, शीख व पारसी या अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी वसतीगृह सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतीगृहे बांधण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यापैकी केंद्र शासनाने राज्यातील ज्या २५ जिल्हयांमधील ४३ शहरे "अल्पसंख्याक बहुल क्षेत्रे" घोषित केली आहेत, अशा २५ जिल्हयांमध्ये प्राथम्याने वसतीगृह उभारणी हाती घेण्यात येईल. प्रस्तावित वसतीगृहांसाठी शासकीय जमीन किंवा विद्यापीठांकडून जमीन उपलब्ध करून घेण्यात येऊन वसतीगृहाचे बांधकाम सिडको/ सार्वजनिक बांधकाम विभाग/ म्हाडा मार्फत करण्यात येईल. सदर वसतीगृहे अल्पसंख्याक विकास विभागामार्फत निवड करण्यात आलेल्या नामांकीत अशासकीय संस्थांकडून चालविण्यात येतील.

**२. वसतीगृहाची प्रवेश क्षमता व जागांचे आरक्षण :-** जागेच्या उपलब्धतेनुसार १०० किंवा २०० मुलींच्या निवासाची सोय या वसतीगृहात करण्यात येईल. यापैकी ७०% जागा अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी राखीव असतील तर उर्वरित ३०% जागा बिगर अल्पसंख्याक समाजातील मुलींमधून शासनाच्या प्रचलित आरक्षणानुसार भरण्यात येतील. ७० जागांपैकी मुस्लिम मुलींसाठी ३५, बौध्द मुलींसाठी २१, ख्रिश्चन मुलींसाठी ६, जैन मुलींसाठी ६, शीख व पारसी मुलींसाठी प्रत्येकी १ जागा राखीव असेल. तसेच एका प्रवर्गातील मुली उपलब्ध न झाल्यास अन्य प्रवर्गातील मुलींना रिक्त जागी प्रवेश देण्यात येईल.

**३. वसतीगृह बांधकामाची कार्यपध्दती :-**

जिल्हाधिकारी/ विद्यापीठाकडून जमीन उपलब्ध झाल्यानंतर, वसतीगृहाच्या बांधकामाबाबत सिडको/ म्हाडासोबत स्वतंत्ररित्या करार करुन सदर जमीन सिडको/ म्हाडाकडे हस्तांतरीत करण्यात येईल. वसतीगृहाच्या बांधकामासाठी आवश्यक निधी सिडको/ म्हाडाकडे वितरीत केला जाईल. वसतीगृहाचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करणार असल्यास अर्थसंकल्पीय तरतूद जिल्हाधिका-यांमार्फत सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वितरीत करून बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत केले जाईल.

**४. अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींसाठी वसतीगृह योजना राबविण्याकरीता खालील कार्यवाही करण्यात येईल :-**

शासकीय किंवा विद्यापीठाच्या जमिनीवर वसतीगृह बांधून नामांकित अल्पसंख्याक अशासकीय संस्थांना, नसल्यास इतर अशासकीय संस्थाना व इतर शासकीय संस्थाना शासनाकडून/ विद्यापीठाकडून ५ वर्षाकरिता करार करून चालविण्यास देण्यात येईल व संबंधित संस्थेचे काम समाधानकारक आढळल्यास वेळोवेळी कराराचे नुतनीकरण करण्यात येईल.

**५. वसतीगृह चालविण्यासाठी इच्छुक अशासकीय संस्थांसाठी निकष / अटी व शर्ती :-**

१) मुलींसाठी वसतीगृहे चालविण्यास इच्छुक असलेली अशासकीय संस्था सामाजिक / शैक्षणिक क्षेत्रात किमान ५ वर्षे कार्यरत असावी.

२) अशी अशासकीय संस्था नोंदणीकृत असावी.

३) वसतीगृहाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर सदर इमारत संबंधित संस्थेकडे सोपविल्यानंतर इमारत देखभाल दुरुस्ती, वेतन व भत्ते, साधन सामुग्री इ. कोणत्याही प्रकारचा निधी शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणार नसल्याने सदर संस्था आर्थिकदृष्टया सक्षम असणे आवश्यक राहील.

४) वसतीगृह चालविण्यासाठी येणारा दैनंदिन खर्च व इमारतीच्या देखभालीवरील खर्च वसतीगृहात प्रवेश घेणाऱ्या मुलींकडून निवास व भोजन व्यवस्थेसाठी वाजवी दराने फी/भाडे आकारणी करून भागविण्यात यावा. आकारण्यात येणारे भाडे / फी चे दर शासनाकडून दर तीन वर्षानी मान्य करून घेणे आवश्यक राहील.

५) वसतीगृह चालविण्यासाठी इच्छुक संस्थेस विहित नमुन्यातील सर्व अटी व शर्तीचे पालन करण्याबाबतचे बंधपत्र सादर करणे आवश्यक राहील. बंधपत्राचा नमुना स्वतंत्रपणे विहित करण्यात येईल.

६) अशा प्रकारचे संस्थेमार्फत चालविल्या जाणाऱ्या वसतीगृहाचे निरीक्षण करण्याचे अधिकार अल्पसंख्याक विभागाचे अधिकारी किंवा प्रतिनिधी यांना राहील.

७) वसतीगृहाच्या इमारतीचा उपयोग अल्पसंख्याक समाजातील शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या निवासाव्यतिरिक्त अन्य कारणांसाठी होत असल्याचे निदर्शनास आल्यास त्यासंदर्भात योग्य ती कार्यवाही करण्याचे अधिकार शासनास राहतील.

८) मंजूरी आदेश किंवा बंधपत्रातील कोणत्याही अटी आणि शर्तीचा भंग झाला आहे किंवा कसे याबाबत सचिव / प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांचा निर्णय अंतिम आणि वसतीगृह चालविणारे संस्थेवर बंधनकारक राहील.

९) सदर संस्थेचे कोणत्याही राजकीय पक्षाशी साहचर्य नसले पाहिजे किंवा कोणत्याही राजकीय पक्षाच्या कार्यासाठी संस्था कार्यरत नसावी.

**६. संस्थेने प्रस्तावासोबत खालील कागदपत्रे जोडणे आवश्यक राहील :-**

१) संस्थेच्या नोंदणी प्रमाणपत्राची सत्यप्रत.

२) संस्थेचे मागील तीन वर्षाचे लेखा परीक्षण विवरणपत्र (Audit Statement) ताळेबंदपत्रकासह च्या प्रती.

३) वसतीगृह/ शैक्षणिक संस्था चालविण्याच्याअनुभवाबाबतचे विधीग्राह्य पुरावे.

४) सदर संस्थेस विहित नमुन्यातील बंधपत्र सादर करणे आवश्यक राहील. बंधपत्राचा नमूना स्वतंत्रपणे विहित करण्यात येईल.

**७.** अ) वसतीगृहाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिध्द करून या योजनेखाली वसतीगृह चालविण्यासाठी इच्छुक संस्थांकडून आवश्यक कागदपत्रांसह विहित नमुन्यातील अर्ज मागविण्यात येतील.

ब) प्राप्त अर्जांची छाननी करून संस्थेच्या पात्रतेविषयीचा निर्णय प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत घेतला जाईल. समितीमध्ये सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग व अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग हे सदस्य राहतील. अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग हे या समितीचे सदस्य सचिव म्हणून काम पाहतील.

**८.** यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, (०१)(०८) शहरातील अल्पसंख्याक समाजातील मुलींच्या वसतीगृहाकरिता सहाय्यक अनुदान (२२३५ ए १४२) ३१ सहाय्यक अनुदान" या लेखाशीर्षातंर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

**९.** हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या मान्यतेने वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमाक ४८७/०९/व्यय-४, दि. ११.०८.२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**१०.** सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd.maharashtra.gov.in) उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१००२१७१६५४१२००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( उ. सं. दांडेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग
अध्यक्ष, मौलाना आझाद अ. आर्थिक विकास महामंडळ, मुंबई.
उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
संचालक, लेखा व कोषागारे
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग
व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अ.आ.वि.महामंडळ,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
सर्व मंत्रालयीन विभाग
उपसचिव, वित्त विभाग व्यय-४,मंत्रालय, मुंबई
उपसचिव,नियोजन विभाग १४७५,मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.